**मुख्यमंत्री सहायता निधी न्यास व्यवस्थापन समितीचे नियम व विनियम**

**महाराष्ट्र शासन**
**सामान्य प्रशासन विभाग,**
**शासन निर्णय क्रमांक-सीआरएफ-२०१७/प्र.क्र. ६७ /२०१७/अर्थसं**
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
**दि. १६ मार्च, २०२४.**

**वाचा :** १) शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग, क्रमांक सीआरएफ-१०६७/बी, दि.२.३.१९६७.
२) शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग, क्रमांक सीआरएफ-२००१/प्र.क्र.१९७/२००१/२५, दि.१५.११.२००१.
३) शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग, क्रमांक सीआरएफ-२००९/प्र.क्र.२०९/२००९/२५, दि.१६.२.२०१०.
४) शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग, क्रमांक-सीआरएफ-२०१७/प्र.क्र.६७/२०१७/२५, दि.१७ एप्रिल, २०१७.

**प्रस्तावना:-**

राज्यातील तथा देशातील नैसर्गिक आपत्तीतील आपदग्रस्तांना अर्थसहाय्य करण्याच्या उद्दिष्टाने **"मुख्यमंत्री सहायता निधी"** या सार्वजनिक न्यासाची स्थापना शासन निर्णय सामान्य प्रशासन विभाग क्रमांक सीआरएफ -१०६७/बी, दि.२.३.१९६७ अन्वये करण्यात आली होती. तसेच, शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग, क्रमांक: सीआरएफ-२००१/प्र.क्र.१९७/२००१/२५, दि.१५.११.२००१ अन्वये उद्दिष्टांच्या व्याप्तीत वाढ करण्यात आली. तद्नंतर शासन निर्णय सा.प्र.वि. दि.१७.०४.२०१७ व दि.०६.०७.२०१७ अन्वये ध्येय व उद्दिषटामध्ये ९, १० व ११ व्या उद्दिष्टाचा समावेश करण्यात आला. मुख्यमंत्री सहाय्यता निधी (कोविड-१९) या निधीच्या बचत खात्यामध्ये सद्यस्थितीत शिल्लक असलेल्या रकमेचा विनियोग आरोग्य विषयक मूलभूत सोयीसुविधांच्या कारणांसाठी करण्याबाबतचा प्रस्ताव विचाराधीन होता.

**शासन निर्णय :-**

मुंबई सार्वजनिक विश्वस्त व्यवस्था अधिनियम १९५० मधील तरतुदीनुसार न्यासाच्या उद्दिष्टात वाढ करण्याच्या दृष्टीने सामान्य प्रशासन विभाग, क्रमांक: सीआरएफ- २००१/प्र.क्र.१९७/२००१/२५, दि.१५.११.२००१ या शासन निर्णयातील उद्दिष्टांमधील उद्दिष्ट क्रमांक (११) नंतर पुढीलप्रमाणे उद्दिष्ट समाविष्ट करण्यात येत आहे. -

**ध्येये व उद्दिष्टे -**

**क्र.१२.** "सद्यस्थितीत कोविड-१९ विषाणूचा प्रादुर्भाव कमी झाला असला तरी भविष्यात कोविड अथवा कोविड सदृश्य अन्य संसर्गजन्य आजारांचा प्रादुर्भाव उद्धवल्यास तो रोखणे तसेच त्यावरील उपचारांसाठी अद्ययावत आरोग्यविषयक पायाभूत सुविधांनी महाराष्ट्र राज्य सुसज्ज असणे

आवश्यक आहे. यास्तव, सार्वजनिक आरोग्य विषयक पायाभूत सुविधांचे बळकटीकरण व निर्मिती यासाठी मुख्यमंत्री सहाय्यता निधी (कोविड-१९) तून अर्थसहाय्य देणे."

२. हा शासन निर्णय विधी व न्याय विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्रमांक १००-२०२४/E, दिनांक ०९.०२.२०२४ अन्वये निर्गमित करण्यात येत आहे.

३. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध असून त्याचा संगणक संकेतांक २०२४०३१६११३२३२४००७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

POONAM APPASAHEB NIKAT

Digitally signed by POONAM APPASAHEB NIKAT
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=GENERAL ADMINISTRATION DEPARTMENT, 2.5.4.20=4244125d615d0ed721459edc809359f4ab75dd3e50a5a0a98c65e19e76ee1c5, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=D685FEFE26CBBD0A3DD72ECF2724309E44D5F2DB33F88465536810293EEA17B2, cn=POONAM APPASAHEB NIKAT
Date: 2024.03.16 11:41:52 +05'30'

(पूनम निकत)
कक्ष अधिकारी, महाराष्ट्र शासन

**प्रति,**

१. राज्यपालांचे सचिव,
२.मुख्यमंत्र्यांचे अपर मुख्य सचिव / प्रधान सचिव / सचिव
३.उपमुख्यमंत्री (गृह) यांचे सचिव
४.उपमुख्यमंत्री (वित्त व नियोजन) यांचे सचिव
५.मुख्य सचिवांचे सह/उप सचिव,
६. मंत्री (पुनर्वसन व मदत कार्य) यांचे खाजगी सचिव,
७. इतर सर्व मंत्री यांचे खाजगी सचिव,
८. अपर मुख्य सचिव/ प्रधान सचिव (वित्त/विधि व न्याय)
९. मंत्रालयीन विभागाचे सर्व अपर मुख्य सचिव / प्रधान सचिव / सचिव,
१०. सचिव व विशेष आयुक्त (मदत व पुनर्वसन)
११. धर्मादाय आयुक्त, महाराष्ट्र राज्य, वरळी, मुंबई -४०० ०१८,
१२. सहाय्यक संचालक (निधी व लेखा) मुख्यमंत्री सचिवालय,
१३. सर्व विभागीय आयुक्त,
१४. सर्व जिल्हाधिकारी,
१५. निवड नस्ती.